# महाराष्ट्र शासन

क्र.संकीर्ण २०१८/प्र.क्र.३९/कोषा प्रशा-४
वित्त विभाग, मादाम कामा रोड,
हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : १८ जुलै, २०१८

**संदर्भ** :१) शासन अधिसूचना , सामान्य प्रशासन विभाग क्र. आरव्ही २००४/प्र.क्र१५/०४/१२, दि.२५.५.२००६
२) शासन अधिसूचना, सामान्य प्रशासन विभाग क्र.पीओडी१००७/प्र.क्र.९/१८(र.व का.), दि.१४.११.२०१३
३) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्र.संकीर्ण२०१२/प्र.क्र.५४/१८(र.व का.),दि.११.८.२०१४

## कार्यालयीन आदेश

महाराष्ट्र शासकीय कर्मचा-यांच्या बदल्यांचे विनियम आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम,२००५ हा राज्यात लागू करण्यात आलेला आहे. सदर अधिनियमाच्या कलम ९ (१) व (२) तसेच शासकीय कर्तव्ये पार पाडतांना होणा-या विलंबास प्रतिबंध नियम, २०१३ तयार करण्यात आलेले असून ते दि.१४ नोव्हेंबर, २०१३ च्या अधिसूचनेद्वारे राज्यात लागू करण्यात आलेले आहेत. त्यासाठी कलम ६ अंतर्गत विभागाशी / कार्यालयाशी संबंधित सर्व बाबींवर अंतिम निर्णय घेण्याच्या दृष्टीने प्रकरणे सादर करण्याबाबत अधिका-यांचे शक्यतो तीन स्तर निर्धारित करण्याचे निदेश देण्यात आलेले आहेत.

२. त्याअनुषंगाने कोषा-प्रशा-४ या कार्यासनाशी संबंधित विषयांबाबत खालील तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे निर्णय घेण्यासाठी सादरीकरणाचे स्तर निश्चित करण्यात आलेले आहेत.

| अ. क्र | विषय | सादरीकरणासाठी अधिकाऱ्यांचे स्तर | | |
|---|---|---|---|---|
| | | प्रथम | व्दितीय | तृतीय |
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | वर्ग-१ व वर्ग-२ संवर्गातील अधिका-यांना, व्याख्याते/परिक्षक यांना फी/मानधन मंजूर करण्याबाबतची प्रकरणे | सहायक कक्ष अधिकारी/ कक्ष अधिकारी | उप सचिव | प्रधान सचिव |
| २ | कोषागारातील लेखे इ. संगणीकरण, त्यासाठी करावयाची तरतूद व तदनुषंगिक सर्व कामे | सहायक कक्ष अधिकारी/ कक्ष अधिकारी | उप सचिव | प्रधान सचिव |
| ३ | कोषागारे व उप कोषागाराकरीता इमारती बांधण्यासंबंधीची प्रकरणे | सहायक कक्ष अधिकारी/ कक्ष अधिकारी | उप सचिव | प्रधान सचिव |
| ४ | लेखा व कोषागारे संचालनालय व इतर कार्यालये याकरिता जागा भाडयाने घेण्याबाबत | सहायक कक्ष अधिकारी/ कक्ष अधिकारी | उप सचिव | प्रधान सचिव |
| ५ | लेखा व कोषागारे संचालनालयाचे स्थायी अग्रिम मंजूर करणे | सहायक कक्ष अधिकारी/ कक्ष अधिकारी | उप सचिव | प्रधान सचिव |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ६ | पुस्तके/प्रकाशने व त्यांची खरेदी | सहायक कक्ष अधिकारी/ कक्ष अधिकारी | उप सचिव | प्रधान सचिव |
| ७ | लेखा व कोषागारे संचालनालयासंबंधीच्या इतर संकिर्ण बाबी | सहायक कक्ष अधिकारी/ कक्ष अधिकारी | उप सचिव | प्रधान सचिव |
| ८ | लेखा व कोषागारे संचालनालयाच्या अर्थसंकल्पीय बाबी | सहायक कक्ष अधिकारी/ कक्ष अधिकारी | उप सचिव | प्रधान सचिव |
| ९ | वरील विषयासंबधीची न्यायालयीन प्रकरणे लोकसभा/राज्यसभा, विधानसभा/विधानपरिषद प्रश्न, ठराव इत्यादी बाबी | सहायक कक्ष अधिकारी/ कक्ष अधिकारी | उप सचिव | प्रधान सचिव |
| १० | मा. मुख्यमंत्री यांना वेळोवेळी मिळालेल्या भेटवस्तू अभिरक्षा व त्याची विल्हेवाट लावणे- उपायनगार तोषाखाना | सहायक कक्ष अधिकारी/ कक्ष अधिकारी | उप सचिव | प्रधान सचिव/ मा.राज्यमंत्री/ मा.मंत्री |
| ११ | स्थानिक निधी लेखा संचालनालयाच्या आस्थापनाविषयक बाबी वगळून अन्य प्रकरणे | सहायक कक्ष अधिकारी/ कक्ष अधिकारी | उप सचिव | प्रधान सचिव |
| १२ | स्थानिक निधी लेखा परिक्षा अधिनियम व तत्संबंधीच्या बाबी | सहायक कक्ष अधिकारी/ कक्ष अधिकारी | उप सचिव | प्रधान सचिव/ मा.राज्यमंत्री/ मा.मंत्री |

३. तथापि, वरिष्ठ अधिकाऱ्यांचे निर्देश असल्यास किंवा विशिष्ट अपवादात्मक प्रकरणी आवश्यकता भासल्यास प्रकरणपरत्वे त्यामध्ये योग्य तो बदल करण्यात येईल. तसेच धोरणात्मक बाबींच्या प्रकरणांत दि.११.०८.२०१४ च्या परिपत्रकात नमूद केल्यानुसार सादरीकरणाचे तीनपेक्षा अधिक स्तर असतील.

४. सदर शासन आदेश शासनाच्या www.maharashtra.gov.in. या संकेतस्थळावर उपलब्ध असून, त्याचा संगणक सांकेतांक २०१८०७१८१४१७१३४३०५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करुन काढण्यात येत आहे.

Digitally signed by Ashok G Chaudhari
Date: 2018.07.18 14:18:53 +05'30'

**(अशोक चौधरी)**
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत :**

१) अपर मुख्य सचिव (वित्त) यांचे स्वीय सहायक, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
२) प्रधान सचिव ( ले व को) यांचे स्वीय सहायक, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
३) उप सचिव (कोषा प्रशा ४), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
४) उप सचिव (प्रशासन), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
५) अवर सचिव (प्रशासन २), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
६) अवर सचिव (आस्थापना ), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई,
६) निवड नस्ती/कोषा-प्रशा-४.